जुलै-ऑक्टोबर २०१९ मधील अतिवृष्टी व पूर
बाधित व्यक्तींना मदत देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०१९/प्र.क्र.१७७/म-३**
**हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२**
**तारीख:- १३ डिसेंबर, २०१९**

**संदर्भ:** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१९/ प्र.क्र.१६५/ म-३, दिनांक २९/०८/२०१९ व दिनांक ११/०९/२०१९
२) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. मह-२/नैआ/कावि/१३९०/२०१९, दिनाक०६/१२/२०१९

**प्रस्तावना :**

राज्यातील विविध जिल्ह्यातील शहरी व ग्रामीण भागामध्ये दि. २६ जुलै व त्यानंतर झालेल्या अतिवृष्टीमुळे पुराचे पाणी शहरी व ग्रामीण भागामध्ये पसरले. या पूर परिस्थिमुळे बाधीत झालेल्या कुटुंबियांना मदत देण्याबाबत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील मंत्रीमंडळ उपसमितीने दिनांक १९/०८/२०१९ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार मदतीचे दर व निकष शासन निर्णय क्र. सीएलएस-२०१९/ प्र. क्र.१६५/म-३, दिनांक २९/०८/२०१९ आणि ११/०९/२०१९ अन्वये निश्चित करण्यात आले आहेत.

२. दिनांक २९/०८/२०१९ आणि ११/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील अनु. ४ (१-ब) नुसार "ज्या शेतक-यांनी नुकसान झालेल्या पिकासाठी पीक कर्ज घेतले नाही परंतु त्यांच्या पिकांची अतिवृष्टीमुळे व पुरामुळे किमान ३३% हानी झाली आहे अशा शेतक-यांना १ हेक्टरच्या मर्यादेत (संबंधित शेतक-याकडे १ हेक्टरपेक्षा जास्त कितीही शेती असली तरी) दि. १३/०५/२०१५ च्या शासन निर्णयानुसार राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF)/राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधी (NDRF) नुसार त्या त्या पिकासाठी/क्षेत्रासाठी अनुज्ञेय असलेल्या मदतीच्या दराच्या तिप्पट रक्कम मदत म्हणून देण्यास मान्यता देण्यात आली आहे." त्यानुसार विभागीय आयुक्त, पुणे यांनी रूपये ३८९,३५,७७,०००/- (अक्षरी रूपये तीनशे एकोणनव्वद कोटी पस्तीस लाख सत्याहत्तर हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्याची मागणी केलेली आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

दिनांक २९/०८/२०१९ आणि ११/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील अनु. ४ (१-ब) नुसार ज्या शेतक-यांनी नुकसान झालेल्या पिकासाठी पीक कर्ज घेतले नाही परंतु त्यांच्या पिकांची अतिवृष्टीमुळे व पुरामुळे किमान ३३% हानी झाली आहे अशा शेतक-यांना १ हेक्टरच्या मर्यादेत (संबंधित शेतक-याकडे १ हेक्टरपेक्षा जास्त कितीही शेती असली तरी) दि. १३/०५/२०१५ च्या शासन निर्णयानुसार राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF)/राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधी (NDRF) नुसार त्या त्या पिकासाठी/क्षेत्रासाठी अनुज्ञेय असलेल्या मदतीच्या दराच्या तिप्पट रक्कम मदत म्हणून देण्यास प्राप्त झालेल्या शासन मान्यतेनुसार, विभागीय आयुक्त, पुणे यांनी मागणी केलेला निधी रक्कम रूपये ३८९,३५,७७,०००/- (अक्षरी रूपये तीनशे एकोणनव्वद कोटी पस्तीस लाख सत्याहत्तर हजार फक्त) सोबत जोडण्यात आलेल्या विवरणपत्रानुसार वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील प्रयोजनासाठी प्रचलित दरानुसार होणारा खर्च प्रधान लेखाशीर्ष "२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळ इत्यादी, १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०५) पीक नुकसानीमुळे शेतक-यांना मदत, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ २४५२)" या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

३. तसेच राज्य शासनाकडून द्यावयाच्या वाढीव मदतीसाठी होणारा खर्च प्रधान लेखाशीर्ष "२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळ इत्यादी, १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद

निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९१) (१२) पीक नुकसानीमुळे शेतक-यांना मदत, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ २३०९)" या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

४. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रामध्ये दर्शविल्यानुसार निधी जिल्ह्यांना विभागीय आयुक्तांमार्फत उपलब्ध करुन देण्यात येत आहे. कक्ष अधिकारी (म-११) यांनी सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करावा.

५. उपरोक्त दराने देण्यात येणारी मदत ही केवळ याच घटनांसाठी मर्यादित राहील. ही बाब अन्य प्रकरणी पुर्वोदाहरण म्हणून समजण्यात येऊ नये. तसेच प्रस्तुत निधी वितरीत करतांना दि.२९/८/२०१९ व दि. ११/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात यावी.तसेच मदतीचे वाटप करताना खालीलप्रमाणे दक्षता घेण्यात यावी.

i) प्रचलित नियमानुसार शेती / बहुवार्षिक फळपिकाच्या नुकसानीकरीता मदत ३३ टक्के अथवा त्याहून अधिक नुकसान झालेल्यांना अनुज्ञेय राहील.

ii) प्रचलित पध्दतीनुसार कृषी सहायक, तलाठी व ग्राम सेवक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने पूर्ण करण्यात आलेल्या पंचनाम्यानुसार सर्व जिल्हाधिकारी यांनी दिलेल्या अहवालानुसार मदतीचे वाटप जिल्हाधिकारी यांना करावे.

iii) संबंधित बाधितांच्या बँक बचत खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात यावी.

iv) कोणत्याही बाधितांना रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत करण्यात येऊ नये.

v) पिकांच्या नुकसानीबाबतची मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये. याकरिता सहकार विभागाने योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

६. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची विभागीय आयुक्त यांनी खातरजमा करावी. निधी वाटपाचे लेखे, अभिलेखे, नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत होणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात याव्यात. झालेल्या खर्चाचा कोषागार कार्यालय व महालेखापाल कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी दर तीन महिन्यांनी ताळमेळ घेवून त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या विभागाकडे तात्काळ सादर करण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. वितरीत अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२१३१३२०५७०५१९ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2019.12.13 13:23:59 +05'30'

**( सु.ह.उमराणीकर)**

**उपसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,

२. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,

३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
४. अपर मुख्य सचिव ( वित्त),मंत्रालय,मुंबई,
५. विभागीय आयुक्त, पुणे विभाग
६. जिल्हाधिकारी, पुणे/सातारा/सांगली/सोलापूर/कोल्हापूर
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
९. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/सातारा/सांगली/सोलापूर/कोल्हापूर
११. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१२. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१३. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१४. निवड नस्ती (कार्यासन/ म-३

## महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक, सीएलएस-२०१९/प्र. क्र. १७७/म-३, दि. १३/१२/२०१९ सोबतचे विवरणपत्र.

**पुणे विभाग** **(रक्कम रूपये)**

| अ. क्र. | जिल्हा | कोरडवाहू पिके | | | आश्वासित सिंचनाखालील पिके | | | बहुवार्षिक पिके | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | NDRF च्या निकषानुसार रू.६८००/- प्रति.हेक्टर च्या मर्यादेत. (लेखाशीर्ष (२२४५२४५२) | राज्य शासनाच्या निधीतुन रू. १३६००/- प्रति.हेक्टर च्या मर्यादेत (लेखाशीर्ष २२४५२३०९) | एकूण (३+४) | NDRF च्या निकषानुसार रू.१३५००/ प्रति.हेक्टर (लेखाशीर्ष (२२४५२४५२) | राज्य शासनाच्या निधीतुन रू.२७०००/ प्रति.हेक्टर. (लेखाशीर्ष २२४५२३०९) | एकूण (६+७) | NDRF च्या निकषानुसार रू.१८०००/ प्रति.हेक्टर. (लेखाशीर्ष (२२४५२४५२) | राज्य शासनाच्या निधीतुन रू.३६०००/ प्रति.हेक्टर. (लेखाशीर्ष २२४५२३०९) | एकूण (९+१०) | एकूण वितरीत करावयाची रक्कम (५+८+११) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| १. | पुणे | ३,३५,२३,००० | ६,७०,४५,००० | **१०,०५,६८,०००** | १,३३,०६,००० | २,६६,१२,००० | **३,९९,१८,०००** | ३,७१,००० | ७,४२,००० | **११,१३,०००** | **१४१५९९०००** |
| २. | सातारा | १४,४२,५२,००० | २८,८५,०४,००० | **४३,२७,५६,०००** | ५,७७,५९,००० | ११,५५,१८,००० | **१७,३२,७७,०००** | ७,९८,००० | १५,९६,००० | **२३,९४,०००** | **६०८४२७०००** |
| ३. | सांगली | ४,२६,७४,००० | ८,५३,४६,००० | **१२,८०,२०,०००** | ३७,८४,९५,००० | ७५,६९,८९,००० | **११३,५४,८४,०००** | १,४३,१७,००० | २,८६,३५,००० | **४,२९,५२,०००** | **१३०६४५६०००** |
| ४. | सोलापूर | ३३,३६,००० | ६६,७२,००० | **१,००,०८,०००** | ८,१०,२०,००० | १६,२०,४०,००० | **२४,३०,६०,०००** | ३३,१६,००० | ६६,३१,००० | **९९,४७,०००** | **२६,३०,१५०००** |
| ५. | कोल्हापूर | ९,२४,४८,००० | १७,४९,७९,००० | **२६,७४,२७,०००** | ४३,७२,७७,००० | ८६,५२,७२,००० | **१३०,२५,४९,०००** | १७,११,००० | २३,९३,००० | **४१,०४,०००** | **१५७,४०,८०,०००** |
| | **एकूण** | **३१,६२,३३,०००** | **६२,२५,४६,०००** | **९३,८७,७९,०००** | **९६,७८,५७,०००** | **१९२,६४,३१,०००** | **२८९,४२,८९,०००** | **२,०५,१३,०००** | **३,९९,९७,०००** | **६,०५,१०,०००** | **३८९,३५,७७,०००** |

******